सोनवद मध्यम प्रकल्पावरील धरण सुरक्षिततेच्या दृष्टिने आढळलेल्या त्रुटीच्या पूर्ततेच्या कामांना प्रशासकीय मान्यता बाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(५१२ /१४)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई
तारीख: १२ /०९/२०१४

वाचा

कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्रमांक कासं/तापाविम/प्रशा-६/४०७५ /२०१४, दि.२२.८.२०१४

प्रस्तावना

सोनवद मध्यम प्रकल्प, ता.शिंदखेडा, जि. धुळे हा प्रकल्प गुळ नाल्यावर बांधण्यात आलेला आहे. पाणलोट क्षेत्राव्दारे येणारी आवक पुरेशी नसल्याने पांझरा नदीवरील न्याहळोद बंधा-यापासून १४.७० कि.मी. लांबीच्या पोच कालव्याव्दारे धरण भरण्यात येते. धरणास चार दरवाजेयुक्त सांडवा आहे व साखळी क्र.१४१० मीटरवर विमोचक बांधण्यात आलेले आहेत. धरणात एकूण १४.३६ द.ल.घ.मी. उपयुक्त पाणी साठा होतो. त्याव्दारे २१४७ हेक्टर सिंचन होते. धरणाची एकूण लांबी ४ कि.मी. इतकी आहे. धरण बांधुन १५ वर्षे पूर्ण झालेली आहेत. धरणाच्या खालील बाजूकडील उतारावरील मुरूम ब-याच लांबीत घसरल्यामुळे व काही लांबीत भराव बसल्याने संकल्पचित्र काटछेद आंतरवक्र झालेला आहे. त्यामुळे रेनकट पडण्याचे प्रमाण वाढलेले आहे. तसेच ब-याच लांबीत अश्मपटलाचे व रॉकटोचे मोठया प्रमाणात नुकसान झालेले आहे. तसेच धरणाचा माथा ब-याच लांबीत खचलेला आहे व माथारुंदीसुध्दा ब-याच लांबीत कमी झालेली आहे. ड्रेन रॉकटो आस्तित्वातील बांधकामे यांनासुध्दा काहीअंशी दूरूस्ती सुचविण्यात आलेल्या आहेत. वरील सर्व बाबी लक्षात घेता, धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यक बाबीच्या अंदाजपत्रकास करुन प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय

या शासन निर्णयाव्दारे विस्तार व सुधारणा योजनेंअंतर्गत सोनवद मध्यम प्रकल्पास धरण सुरक्षिततेच्या दृष्टिने आढळलेल्या त्रुटीच्या पूर्ततेसाठीच्या कामास रु. ७४.६७ लक्ष (कामावरील खर्च रु ६७.८८ लक्ष व ६.७९ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

२) अंदाजपत्रकातील तरतूदी सक्षम स्तरावर तपासून तांत्रीक मान्यता प्रदान करावी.

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Mile Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stones साध्य करणे अपेक्षित असून

जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झालयास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी
५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडूनच करुन घेण्यात यावे

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा (१२)(०३ ) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १८५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.५० सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१५१७५६००८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 17:59:41 +05'30'

(सं.अ.टाटू)
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१५.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
२०.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२३.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

परिशिष्ट

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १) | कामावरील खर्च | ६७.८८ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | ६.७९ |
| | एकूण व | ७४.६७ |

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 18:00:05 +05'30'

(सं.अ.टाटू)
शासनाचे उप सचिव